# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्र.एमआयएस-११९९/१६८९/सीआर-२८/इएक्ससी-३,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक : १९ ऑगस्ट, २००३

**शासन निर्णय :-** राज्यात मद्यापासून मिळणारे उत्पन्न हे महसूल मिळवून देणाऱ्या विविध बाबींपैकी एक प्रमुख स्त्रोत आहे. सध्या राज्यात निर्माण होणाऱ्या मद्यापैकी तीव्र मद्याच्या विक्रीत वाढ होत आहे. त्याचप्रमाणे तीव्र व सौम्य मद्यातील प्रामुख्याने तीव्र बीअर व सौम्य बीअरच्या किंमतीत फारसा फरक नसल्यामुळे राज्यातील जनता विशेषत: तरुण वर्ग तीव्र मद्याकडे वळू लागला आहे. राज्यातील तरुण वर्ग व्यसनाधीन बनू नये म्हणून तीव्र मद्याऐवजी सौम्य बीअरला काही प्रमाणात सवलती देऊन उपलब्धता वाढविणे, तीव्र बीअर व सौम्य बीअरच्या किंमतीत तुलनात्मक फरक ठेवून तरुण पिढीस तीव्र मद्यापासून सौम्य मद्याकडे वळविणे, तसेच इतर राज्यातील बीअरच्या किंमतीच्या तुलनेत महाराष्ट्र राज्यातील बीअरच्या किंमतीतील तफावत काही अंशी कमी करुन राज्यातील बीअर निर्माण्यांसमोरील असणाऱ्या अडचणी दूर करण्याच्या दृष्टीने बीअर धोरणात सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत :-

(१) सौम्य बीअरवर निर्मिती मूल्याच्या ७५% किंवा रु.१२.०० प्रति बल्क लिटर यापैकी जे जास्त असेल तेवढे उत्पादन शुल्क आकारण्यात यावे.

(२) सौम्य बीअरसाठी निर्मिती मूल्याच्या तीन पट कमाल किरकोळ विक्री किंमत (MRP) निश्चित करण्यात यावी.

(३) तीव्र बीअरवर उत्पादन शुल्क रु.२० प्रति बल्क लिटर किंवा उत्पादन मुल्याच्या १००% यापैकी जे जास्त असेल त्या दराने आकारण्यात यावे. तसेच तीव्र बीअरची MRP निश्चित करण्यासाठी गुणांक ३.२५ ऐवजी ३.५० करावा

(४) सीएल-३ अनुज्ञप्तीधारकांना बंद बाटलीतून सौम्य/तीव्र बीअर विक्री करण्यासाठी पूरक अनुज्ञप्ती देणे व त्यासाठी सीएल-३ अनुज्ञप्तीच्या अनुज्ञप्ती शुल्काच्या २५% रक्कम अनुज्ञप्ती शुल्क म्हणून आकारणे.

(५) परमीट रुम (एफएल-३) व बीअरबार (ई) या लायसन्सधारकांना बंद बाटलीतून सौम्य/तीव्र बीअर विक्री साठी एक पूरक अनुज्ञप्ती त्याच आस्थापनेच्या आवारात देणे व त्यासाठी परमीट रुमच्या अनुज्ञप्ती शुल्काच्या २५% रक्कम अनुज्ञप्ती शुल्क म्हणून आकारणे.

(६) नवीन बीअर शॉप्सना (केवळ बंद बाटलीतून सौम्य/तीव्र बीअर विक्रीसाठी) FL-II च्या धर्तीवर परवानगी देणे व त्यासाठी परमिट रुमला आकारण्यात येणाऱ्या लायसन्स फीच्या २५% लायसन्स फी आकारणे. नवीन बीअर शॉप्स डिपार्टमेंटल स्टोअर्समध्ये देखील मंजूर करता येतील.

(७) इच्छुक खाद्य पदार्थ अनुज्ञप्ती (Eating House Licence) धारकांना आस्थापनेचे किमान क्षेत्रफळ व प्रसाधन गृहाच्या सद्याच्या अटीमध्ये शिथिलता देऊन सौम्य बीअर विक्रीसाठी "ई" नमुन्यात अनुज्ञप्ती देणे व त्यासाठी बीअर बार लायसन्सधारकांना (ई लायसन्सधारकांना) जेवढे अनुज्ञप्ती शुल्क आकारण्यात येते. तेवढे अनुज्ञप्ती शुल्क आकारण्यात यावे.

एमं-८०६० (१००० -०९- ०३) १

(८) बीअर विक्री अनुज्ञप्ती मंजूर करण्याचे अधिकार सध्या अस्तित्वात असलेल्या जिल्हाधिकारी याच्या अध्यक्षतेखालील समितीला असतील.

(९) बीअर वरील निर्यात शुल्क रुपये २/- प्रति बल्क लिटर वरुन रुपये १/- प्रति बल्क लिटर करण्यात यावे.

(१०) बीअरवरील आयात शुल्क रुपये ३/- प्रति बल्क लिटर वरुन रुपये ४/- प्रति बल्क लिटर करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

नाना (ना. उ. रोंगे)

( ना. उ. रोराळे )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
निवडनस्ती (इएक्ससी-३).

---

(२) ०६०८१००-०९-०३) १३१

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन शुद्धीपत्रक क्र.एमआयएस-११९९/१६८९/सीआर-२८/इएक्ससी-३,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक : ३ नोव्हेंबर, २००३

वाचा :- शासन निर्णय क्र.एमआयएस-११९९/१६८९/सीआर-२८/इएक्ससी-३, दि.१९ ऑगस्ट, २००३

<u>**शासन शुद्धीपत्रक :-**</u> शासन निर्णय, समक्रमांक दि.१९.८.२००३ मधील अनुक्रमांक (६) "नवीन बीअर शॉप्सना (केवळ बंद बाटलीतून सौम्य/तीव्र बीअर विक्रीसाठी) FL-II च्या धर्तीवर परवानगी देणे व त्यासाठी परमिट रुमला आकारण्यात येणाऱ्या लायसन्स फीच्या २५% लायसन्स फी आकारणे. नवीन बीअर शॉप्स डिपार्टमेंटल स्टोअर्समध्ये देखील मंजूर करता येतील." यामधील "नवीन बीअर शॉप्स डिपार्टमेंटल स्टोअर्समध्ये देखील मंजूर करता येतील." हे वाक्य वगळण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ना. ड. रोराळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
निवडनस्ती (इएक्ससी-३).